**अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारीत नसलेले (Non-AICTE) तथापि महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाच्या अखत्यारीत असलेल्या संस्थेतील अभ्यासक्रम बंद करून अनामत रक्कम परत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. मान्यता-२०१९/(प्र.क्र.१३०/१९)/तांशि-५,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ नोव्हेंबर, २०१९

वाचा:-१.उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक मान्यता- २००७/(६९/०७) तांशि-६, दिनांक ०५.०७.२००७.
२.संचालक, महाराष्ट्र राज्य मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.मरातंशिमं/का-५३/२०१९/४०५२, दिनांक १४.०५.२०१९

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारित नसलेल्या (Non-AICTE) तथापि महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाच्या अखत्यारित असलेल्या संस्थेतील (Non-AICTE) अभ्यासक्रम बंद करून संस्थेने जमा केलेली नियत ठेव संस्थेच्या खाती वर्ग करण्याबाबत महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांनी शासनास विनंती केली आहे. सदर विनंतीस अनुसरून संस्थेमार्फत चालवले जात असलेला (Non-AICTE) अभ्यासक्रम बंद करून संस्थेने सदर अभ्यासक्रमाकरीता जमा केलेली नियत ठेव संस्थेच्या खाती वर्ग करण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारित नसलेल्या तथापी महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाच्या अखत्यारित असलेल्या खालील प्रपत्र - अ मध्ये नमूद संस्थेचे अभ्यासक्रम बंद करून नियत ठेव संस्थेच्या खाती वर्ग करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहुल शासन मान्यता देण्यात येत आहे.

**प्रपत्र-अ**

| अ.क्र. | संस्थेचे नाव | अभ्यासक्रम | प्रवेश क्षमता |
|---|---|---|---|
| १. | दत्तात्रय एज्युकेशन ट्रस्टचे इन्स्टिटयूट ऑफ ॲप्रल डिझायनिंग ॲण्ड फॅशन मर्चटायझिंग, बंगला नं.१ इंद्रपरस्थ एनक्लेव्ह, ज्योती नगर, शाहनुर वाडी, दुर्गा रोड, औरंगाबाद. | पोस्ट ग्रॅज्युएट डिप्लोमा इन ॲप्रल ॲड मर्चंटायझिंग | ४० |

१. या संस्थेतील बंद करावयाच्या अभ्यासक्रमांच्या संबंधित सर्व दस्तऐवज जसे की गुणपत्रिका, उत्तरपत्रिका, निकालपत्र, विद्यार्थ्यांचे पत्ते, फीच्या पावत्या इत्यादी बाबी संस्थेने मंडळाकडे सूपूर्द करणे आवश्यक राहील.

२. संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त शिक्षक वर्ग/कर्मचारी यांच्या सेवाविषयक व इतर बाबतीत न्यायप्रविष्ठ असलेली सर्व प्रकरणांची जबाबदारी संस्था प्रमुखांची राहील. भविष्यकाळात कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यास सर्वस्वी संस्था जबाबदार राहील.

३. संस्थेकडून शासनाची वसुली अद्यापी थकबाकी असल्यास त्याचा भरणा करणे संस्था प्रमुखांवर बंधनकारक राहील.

४. संस्थेमध्ये सदर अभ्यासक्रम राबविण्यासाठी आवश्यक स्थरावर जंगम मालमत्तेविषयी या संस्थेने शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतलेले असल्याचे यापुढे निदर्शनास आल्यास त्याची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील.

५. संस्थेतील संबंधित अभ्यासक्रम बंद केल्यानंतर त्या संस्थेतील प्रवेशीत विद्यार्थ्यांना व माजी विद्यार्थ्यांना परीक्षेस बसण्याची इच्छा असल्यास त्याची पर्यायी व्यवस्था करणे संस्थांवर बंधनकारक राहील.

६. संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त केलेल्या संस्थेतील शिक्षक व कर्मचारी यांना देय असलेले वेतन, वेतन भरपाई व अन्य आर्थिक प्रदानाचे भुगतान करणे संस्थेस बंधनकारक राहील.

७. संबंधित संस्थेने उपरोक्त अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी शासनाकडे जमा केलेली नियत ठेव संस्थेच्या खाती वर्ग करण्याची पुढील कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११०७१५२०४३०५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2019.11.07 15:25:08 +05'30'

**( अ. र. काटकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रतिः-**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, ४९, खेरवाडी,वांद्रे (पुर्व), मुंबई-४०००५१

३. संबंधित संस्था (महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचे मार्फत),

४. निवड नस्ती / तांशि-५.